शासकीय कर्मचाऱ्यास होणाऱ्या
अतिप्रदानाबाबत ..........

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः वेतन-१०१८ / प्र. क्र. ३४ /सेवा-३**

मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई ४०० ०३२
तारीख: १७ ऑगस्ट २०२३

<u>वाचा -</u>

१) सिव्हील अपील क्रमांक ११५२७ / २०१४ (विशेष अनुमती याचिका (सी) क्रमांक ११६८४/२०१२ मधून उद्भवलेल्या )(पंजाब राज्य व इतर विरुद्ध रफीक मसीहा, व्हाईट वॉशर, इतर )यामधील मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांचा दिनांक १८.१२.२०१४ चा अंतिम निर्णय

२) सिव्हील अपील क्रमांक ३५०० / २००६ (पंजाब व हरीयाणा उच्च न्यायालय व इतर विरुद्ध जगदेव सिंग ) यामधील मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांचा दिनांक २९.०७.२०१६ चा अंतिम निर्णय

३) मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल झालेल्या याचिका क्रमांक ३४८०/२०२० मध्ये मा. उच्च न्यायालयाने दि.१५.०९.२०२१ रोजी दिलेला न्यायनिर्णय

४) शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण-२०२१/प्र.क्र.५२/सेवा-३, दि.२२.११.२०२१

५) शासन परिपत्रक क्रमांक: वेतन-१०१८/प्र.क्र.३४/सेवा-३, दि.०७.१०.२०२२

६) सिव्हील अपील क्रमांक ७११५ / २०१० (थॉमस डॅनियल विरुद्ध केरळ राज्य ) यामधील मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांचा दिनांक ०२.०५.२०२२ चा अंतिम निर्णय

७) केंद्र शासनाच्या कार्मिक, लोक शिकायत आणि पेन्शन मंत्रालयाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागाचे क्रमांक एफ.नं.१८/०३/२०१५-इएसटीटी.(पे-१), दि.०२.०३.२०१६ रोजीचे कार्यालयीन ज्ञापन.

<u>प्रस्तावना -</u>

गट-अ, गट-ब, गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड मधील राज्य शासकीय अधिकारी व कर्मचाऱ्यांना, त्यांच्या सेवाकाळामध्ये विविध प्रसंगी, त्यांना नियमानुसार अथवा कायद्यानुसार देय व अनुज्ञेय ठरत नसतांना (Excess of their entitlements), शासकीय रकमांचे अतिप्रदान (Excess payment) होत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आलेले आहे. काही प्रसंगी अतिप्रदान झाल्याचे, भविष्यात आढळून आल्यास, अशा अतिप्रदानाची रक्कम, कर्मचारी शासनास परत करेल, अशा आशयाचे वचनपत्र (Undertaking), संबंधित शासकीय कर्मचाऱ्याकडून घेतले जाणे आवश्यक असतांना काही प्रकरणी वचनपत्र घेतले गेले नाही. परिणामी, अशा अतिप्रदानित रकमेची वसुली सुरु केल्यास कर्मचारी त्यास विरोध करत असल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. अतिप्रदानाची रक्कम वसुल करणे किंवा क्षमापित करणे या अनुषंगाने उपरोक्त वाचा येथील अनुक्रमांक १, २ व ६ येथे नमूद

केल्याप्रमाणे मा. सर्वोच्च न्यायालयाने आदेश पारीत केलेले आहेत. त्यामुळे अतिप्रदानाची वसुली वेळेवर होणे आवश्यक आहे. तसेच मा. लोक आयुक्त यांनी केलेल्या शिफारशी विचारात घेऊन केंद्र शासनाच्या धर्तीवर सूचना निर्गमित करणे आवश्यक असल्याने, राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना, त्यांच्या सेवा काळात होणाऱ्या अतिप्रदानाबाबत कायदेशीर अभिमत विचारात घेऊन पुढीलप्रमाणे शासन परिपत्रक निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन परिपत्रक-**

राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना, त्यांच्या सेवा काळात होणाऱ्या अतिप्रदानाच्या रकमांची वसुली क्षमापित (Exemption from recovery of excess payment) करण्याबाबतच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल झालेल्या याचिका क्रमांक ३४८०/२०२० मध्ये मा. उच्च न्यायालयाने दि.१५.०९.२०२१ रोजी आदेश पारीत केले आहेत. मा. उच्च न्यायालयाच्या सदर आदेशातील परिच्छेद क्रमांक ९ व १० खालीलप्रमाणे आहे.

> *"9. Before Parting with this matter, we deem it appropriate to record that we are coming across such cases practically everyday. Most of the cases are in connection with the various zilla parishads and State instrumentalities. In most of the cases, there is no undertaking executed by the beneficiary. We cannot ignore the fact that in such cases, the employee, though disentitled, has pocketed the tax payers amount.*
>
> *10. We, therefore, deem it appropriate to direct the Chief Secretary of the State of Maharashtra to issue appropriate directions to all the departments of the State Government and local authorities/bodies, to mandate executing of undertakings from employees, who would be beneficiaries of pay fixation or calculations of increments or any similar calculations with regard to monetary benefits. It shall be stated that in such undertakings that they would refund excess amounts if subsequently found to have been paid in excess. This would be in the interest of the State Exchequer and would also control excess payments which cannot be recovered subsequently. The Chief Secretary shall consider the judgement delivered by the Hon'ble Apex Court in Jagdev Singh (Supra), wherein the Hon'ble Apex Court has concluded that if an undertaking is executed by such a beneficiary at the time of receiving monetary benefits, he would be liable to repay the said amount to the employer."*

२. शासकीय खजिन्यातील निधी हा करदात्यांकडून जमा करण्यात आलेला सामान्य जनतेचा पैसा आहे. कोणत्याही प्रकारे करदात्यांच्या पैशांचा अपव्यय होणार नाही, या दृष्टीने भविष्यात वसुल न होऊ शकणाऱ्या अतिप्रदान होणाऱ्या रकमेस पायबंद घालणे गरजेचे आहे. ही बाब विचारात घेता मा. उच्च न्यायालयाने उपरोक्त आदेशान्वये मा. सर्वोच्च न्यायालयाच्या श्री. जगदेव सिंग या प्रकरणी दिलेल्या न्यायनिर्णयाचा आधार घेऊन

"लाभधारकांना कोणत्याही रकमेचे प्रदान करण्यापूर्वी, त्याला शासनाकडून कोणत्याही रकमेचे अतिप्रदान करण्यात आले आहे, असे भविष्यात निदर्शनास आल्यास अशी अतिप्रदानाची रक्कम लाभधारक, शासनास परत करण्यास बांधील राहील अशा आशयाचे लिखीत वचनपत्र (Undertaking) घेण्यात यावे", असे शासनास आदेशित केले आहे. त्या अनुषंगाने वित्त विभगाने शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण-२०२१/प्र.क्र.५२/सेवा-३, दि.२२.११.२०२१ रोजी निर्गमित केले आहे.

३. मा. लोक आयुक्त यांनी केलेल्या शिफारशी विचारात घेऊन दि.०७.१०.२०२२ रोजी परिपत्रक निर्गमित केले आहे. सदर परिपत्रकात दिलेल्या सूचना क्र.१ ते ५ ची अंमलबजावणी काटेकोरपणे करण्यात यावी. तसेच सदर परिपत्रकातील सूचना क्रमांक ६ मध्ये केंद्र शासनाच्या दि.०२.०३.२०१६ च्या सूचनांच्या धर्तीवर पुढीलप्रमाणे सूचनांचा अंतर्भाव करण्यात येत आहे.

सिव्हील अपील क्रमांक ११५२७ / २०१४ (विशेष अनुमती याचिका (सी) क्रमांक ११६८४/२०१२ मधून उद्भवलेल्या )(पंजाब राज्य व इतर विरुद्ध रफीक मसीहा, व्हाईट वॉशर, इतर )या मध्ये मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांनी दिनांक १८.१२.२०१४ रोजी दिलेल्या अंतिम निर्णयातील परिच्छेद १२ खालीलप्रमाणे आहे.

*12. It is not possible to postulate all situations of hardship, which would govern employees on the issue of recovery, where payments have mistakenly been made by the employer, in excess of their entitlement. Be that as it may, based on the decisions referred to herein above, we may, as a ready reference, summaries the following few situations, wherein recoveries by the employers, would be impermissible in law:*

*(i) Recovery from employees belonging to Class-III and Class-IV service (or Group 'C' and Group 'D' service).*

*(ii) Recovery from retired employees, or employees who are due to retire within one year, of the order of recovery.*

*(iii) Recovery from employees, when the excess payment has been made for a period in excess of five years, before the order of recovery is issued.*

*(iv) Recovery in cases where an employee has wrongfully been required to discharge duties of a higher post, and has been paid accordingly, even though he should have rightfully been required to work against an inferior post.*

*(v) In any other case, where the Court arrives at the conclusion, that recovery if made from the employee, would be iniquitous or harsh or arbitrary to such an extent, as would far outweigh the equitable balance of the employer's right to recover.*

तरी सर्व विभागांनी उपरोक्त मा.सर्वोच्च न्यायालयाचा निर्णय तसेच उपरोक्त वाचा येथील क्रमांक २ व ६ येथील मा.सर्वोच्च न्यायालयाचे निर्णय विचारात घेऊन योग्य ती कार्यवाही करावी.

४. दि.२२.११.२०२१ रोजीच्या वचनपत्र घेण्याबाबतच्या शासन परिपत्रकापूर्वी झालेल्या अतिप्रदानाच्या वसुली क्षमापित करण्याबाबतची प्रकरणे निदर्शनास आल्यानंतर संबंधित विभागांनी प्रकरणनिहाय तपासणी करुन वित्त विभागाच्या सहमतीसाठी सादर करावीत.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम क्रमांक ४१ नुसार विभागांनी उचित कार्यवाही करणे आवश्यक आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०८१७१५१०३७३५०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHASHIKANT TIJARE

Digitally signed by SHASHIKANT TIJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=e1e60b788875c086f4bc546aefe13773c3d89b2d2497473fc2f335c58c20c42c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E7125EA0D83A0ACA0212D600BE2759B362F98CA65C0F42D0E6ABB896D8991D46, cn=SHASHIKANT TIJARE
Date: 2023.08.17 15:15:32 +05'30'

**( श. ज्ञा. तिजारे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

| | | | |
|---|---|---|---|
| | राज्यपाल यांचे प्रधान सचिव | | आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व) |
| | मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई | | सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई |
| | उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई | | अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई |
| | सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव मंत्रालय, | | निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई |
| | सर्व सन्माननीय विधानसभा, विधान परिषद व संसद सदस्य | | सिनीअर रिसर्च ऑफीसर, पे युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय(व्यय विभाग),खोली क्रमांक २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी मुंबई |
| | सचिव, मा. सभापती, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई | | संचालक लेखा व कोषागारे, मुंबई |
| | सचिव, मा. अध्यक्ष, विधान सभा, विधानमंडळ, मुंबई | | मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई |
| | मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद /विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव | | बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१ (५प्रती) |
| | महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई | | भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बरॅक नं, योगक्षेम समोर, वसंतराव गवस चौक, नरीमन पॉईंट, मुंबई २० (५ प्रती) |
| | महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर | | भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई४ (५प्रती) |
| | मंत्रालयीन सर्व विभाग | | भारतीय कम्युनिस्ट पार्टी(मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅसेल, वरळी, मुंबई१३ (५प्रती) |
| | सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक | | इंडीयन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई२५ (५प्रती) |
| | *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई. | | नॅशनॅलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई -२१ (५प्रती) |
| | *प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई. | | शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २५ (५ प्रती) |
| | *प्रधान सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई. | | जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई |
| | *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई. | | वित्त विभागातील सर्व कार्यासने |
| | *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई | | निवडनस्ती, वित्त विभाग/सेवा-३ |